सन २०२०-२१ पासून पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्हिओसी २०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४**

दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ सप्टेंबर, २०२०

वाचा : १) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दिनांक १० मे,२०१८.
२) विभागाचे पत्र क्र.व्हिओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दि. १२ जुन, २०२० व दि.२८ जुलै,२०२०.
३) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ पुव्याव्दिव्यअमान्यता/२०२०-२१/२०२०/४५, दि.०२ ऑगस्ट,२०२०.

**प्रस्तावना :**

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी तसेच उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नविन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्यासाठीच्या ऑनलाईन प्रमाणित कार्यपध्दतीस विभागाच्या वरील संदर्भ क्र. १ येथील दिनांक १० मे,२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली.

पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमास मान्यता देण्याबाबतच्या कार्यपध्दतीस संदर्भ क्र २ येथील दिनांक १२ जुन,२०२० रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली. तद्नंतर कोविड-१९ च्या परिस्थितीमुळे लॉकडाउन असल्याने शैक्षणिक वर्ष २०२०-२१ साठी सुधारित कालबध्द कार्यक्रमास संदर्भ क्र २ येथील दि.२८ जुलै,२०२० रोजीच्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली.

सन २०२०-२१ करीता पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम, +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांच्या नविन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता देण्याकरीता विहीत मुदतीत (दि.०४ ऑगस्ट, २०२० पर्यंत) ज्या संस्थांनी शासनाच्या vti.dvet.gov.in या वेबपोर्टलवर मान्यतेकरीता अर्ज केले होते व व्यवसायास आवश्यक सर्व सोई-सुविधा पूर्ण करुन निरीक्षणाकरीता विनंती केली होती अशा संस्थांचा निरीक्षण कार्यक्रम शासकीय औदयोगिक प्रशिक्षण संस्थांनी नेमलेल्या समित्यांमार्फत पूर्ण करण्यात आला आहे.सदर निरीक्षण समित्यांनी त्याचे निरीक्षण अहवाल vti.dvet.gov.in या वेबपोर्टलवर अपलोड केले आहेत.त्यातील जे अहवाल तपासुन निरीक्षण समित्यांनी मान्यतेकरीता शिफारस केली आहे असे व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम संस्थांचे १०२ व पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांचे ०२ अहवाल संचालनालयाच्या लॉगइन

वर उपलब्ध झाले आहेत.ज्या संस्थांची निरीक्षण समितीने शिफारस केलेली नाही अशा संस्था पुढील सत्राकरीता पुर्ननिरीक्षणाकरीता अर्ज करु शकतात.

त्यानुसार पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या तुकडयाकरीता प्राप्त झालेल्या अर्जाची संचालनालयास्तरावर छाननी करून संचालनालयाकडून योग्य त्या शिफारशीसह प्रस्ताव संदर्भ क्र.३ येथील दिनांक ०२ ऑगस्ट,२०२० च्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. त्यानुसार सन २०२०-२१ पासुन पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नविन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

## <u>शासन निर्णय</u> :

सन २०२०-२१ पासुन पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यमान तसेच नविन संस्थेत नवीन/अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

शैक्षणिक संस्थांकडून ई-मेलव्दारे प्राप्त दस्तावेजांची छाननी करुन त्यानुसार आवश्यक मानकांची पुर्तता करणाऱ्या ७७ संस्थांना व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांना मान्यतेकरीता संचालनालयाकडुन शिफारस करण्यात आली आहे त्या संस्थांचा तपशिल सोबतच्या प्रपत्र “अ” मध्ये सोबत जोडले आहे. तसेच, पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता संचालनालयाकडुन शिफारस करण्यात आलेल्या ०२ संस्थांचा तपशिल प्रपत्र “ब” मध्ये सोबत जोडले आहे.

## अटी व शर्ती:-

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहिता १९८१ मध्ये नमुद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पुर्तता करणे बंधनकारक राहील. परवानगी प्राप्त झाल्यानंतर संस्थेला माध्यमिक शाळा सहिता व एम.ई.पी.एस. नियम १९८१ नुसार आवश्यक ते सर्व लेखे संस्था स्तरावर ठेवणे बंधनकारक राहील.संस्थेने माध्यमिक शाळा सहितेतील नियमांचे पालन न केल्यास अथवा शासनाने व संचालनालयाने दिलेल्या आदेशाचे, परिपत्रकाचे पालन न केल्यास संस्थेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात येईल.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरु करण्यास कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता दिली असली तरीही,भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यात येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्याकडून वेळोवेळी निर्गमित होणा-या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विदयार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.संस्थेस कमाल मर्यादेपेक्षा जास्त शुल्क विदयार्थ्यांकडून आकारता येणार नाही.

५. **"कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम/+२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम"**असा सूचनाफलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील.सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेशक्षमता यांचा उल्लेख करण्यात यावा.

६. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा /वेतन व तद्नुषंगिक बाबींची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

७. मंजूर अभ्यासक्रमाकरीता आवश्यक शिक्षकीय कर्मचा-यांच्या नियुक्त्या,त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली,१९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार तात्काळ करण्यात यावी व संबंधित जिल्हयाचे जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी प्रवेश यादयांना मान्यता देण्यापूर्वी विहीत अर्हताधारक शिक्षकीय कर्मचा-यांची नियुक्ती करण्यात आली आहे याची खात्री करावी व त्यानंतरच प्रवेश यादयांना मान्यता दयावी.केलेल्या कार्यवाहीचा अहवाल संचालनालयास प्रादेशिक कार्यालयामार्फत सादर करावा.

८. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने धोरणात्मक निर्णय घेतल्यास तो विनाअट व विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

९. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता,शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यात यावेत.

१०.अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळास तात्काळ दयावी व त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

११.मान्यता देण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेशक्षमता प्रति तुकडी ५० इतकी असुन,मंजूर प्रवेशक्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अश्या तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील.

१२.मान्यता प्राप्त अभ्यासक्रम **मान्यता दिलेल्या शैक्षणिक वर्षात संस्थेने सुरु न केल्यास** अथवा सदर अभ्यासक्रमाच्या तुकडीत सतत ३ वर्ष मंजूर प्रवेशक्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर संस्थेची मान्यता आपोआप संपुष्ठात येईल. तद्नंतर संस्थेस सदर अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी मान्यता प्रक्रिया नव्याने करणे आवश्यक राहील.

१३.शासनाने मान्यता दिलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमाचा दर्जा व गुणवत्ता उच्च प्रतीचा राखण्याच्या दृष्टीने संचालनालय स्तरावरुन नियमितपणे प्रवेशित विद्यार्थ्यांची प्रशिक्षण गुणवत्ता तपासण्यासाठी प्रत्येक वर्षी ७५% पेक्षा कमी निकाल असणाऱ्या संस्थेचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्यात येईल. एखाद्या संस्थेचा निकाल सतत ३ वर्षामध्ये ७५% पेक्षा कमी असल्यास सदर संस्थेची मान्यता रद्द करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

१४.शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंर्तभूत करण्याचे अधिकार शासनास राहतील.

१५.संबंधित संस्थेने त्यांच्याकडे भाषा/जीवशास्त्र इत्यादी विषयाचे शिक्षक, मंजूर केलेल्या द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या तुकडीमुळे अतिरिक्त ठरणार नाहीत याची खातरजमा करूनच विद्यार्थ्यांना प्रवेश द्यावा.

16. व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत मंजूर व्यवसाय अभ्यासक्रमाच्या मंजूर तुकडीनुसार मंजूर प्रवेशक्षमतेपेक्षा अतिरिक्त अनधिकृत प्रवेश करता येणार नाही.याकरीता संस्थेस "महाराष्ट्र राज्यात कृषि, पशु व मत्स्य विज्ञान, आरोग्य विज्ञान, उच्च तंत्र व व्यवसाय शिक्षण यांमधील अनधिकृत संस्था स्थापन करणे आणि अनधिकृत अभ्यास पाठ्यक्रम सुरु करणे (प्रतिबंध) अधिनियम,२०१३" लागू राहील.

शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये प्रपत्र "अ" व "ब" मध्ये मान्यता दिलेल्या किती संस्थांनी व्यवसाय अभ्यासक्रम सुरू केले, याबाबत तसेच अभ्यासक्रमनिहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी शासनास दि. ३० सप्टेंबर, २०२० पर्यंत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००९१११६२६०७९६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Dr Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cdf8435b14113ef43d22f63f448b2db4109f1aa98eda5f3b78841f6bc40a437b, cn=Dr Suvarna Siddharth Kharat
Date: 2020.09.11 16:32:36 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१.मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,

२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,

३.सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४.सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५.मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई

६.सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य

७.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई

८.मा. अपर मुख्य सचिव ,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई

९. मा. अपर मुख्य सचिव ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई

१०.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (शालेय शिक्षण विभाग), (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत )

१२. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)

१३. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत )

१४. संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत )

१५. सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय,मुंबई.

१६. निवड नस्ती. (व्यशि-४).

**प्रपत्र अ**

**.+ २ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या विद्यमान तसेच नविन सस्थेंत नविन/अधिकच्या तुकडयांना व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास शैक्षणिक सत्र २०२०-२०२१ या शैक्षणिक सत्रापासुन मान्यता देण्यात आलेल्या संस्थाची यादी.**

| अ.क्र. | विभागाचे नांव | ऑनलाईन नोंदणी क्रमांक | संस्थेचे नाव | मागणी केलेल्या अभ्यासक्रमाचे नाव | तुकडयांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | नागपूर | PBF१७८६५T | डॉ. बाबासाहेब आंबेडकर ममोरीयल सोसायटी चंद्रपूर द्वारा संचलित डॉ. आंबेडकर ज्युनिअर कॉलेज , दिक्षा भुमी , सिव्हील लाईन चंद्रपूर ४४२४०१ | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| २ | नागपूर | PBF१७३६२T | राष्ट्रीय स्नेही शिक्षण संस्था द्वारा संचलित बालाजी कॉन्वेंट हायस्कुल अँड ज्युनिअर कॉलेज जवाहर नगर , जुना सुभेदार ले आऊट नागपूर . ता. जि. नागपूर ४४००२४ | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| ३ | पुणे | PBF०९८५०T | एन.डी. पाटील प्रतिष्ठाण द्वारा संचलित ज्ञानदीप इंग्लिश मिडीयम स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज सांगली, विश्रामबाग ता. जि. सांगली | क्रॉप सायन्स | २ |
| ४ | मुंबई | PBF१७३०६T | जान्हवीस मल्टी फाऊंउेशन डोंबिवलीजनगण मन विद्यामंदीर अँड ज्युनिअर कॉलेज संस्कृती विहार , डॉ. नेमाडे रोड टेलकॉस वाडी , जुनी डोंबिवली , डोंबिवली (प) ता. कल्याण जि.ठाणे | बँकीग | १ |
| | | | | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | २ |
| ५ | औरंगाबाद | PBF१७८८५T | गंगामाता शिक्षण प्रसारक मंडळ लहाण ता. अर्धापुर जि. नांदेड द्वारा संचलित कै. दिगंबर आवोजी देवडे उच्च माध्यमिक विद्यालय मु.पो. लहाण ता. अर्धापुर जि. नांदेड | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| ६ | नागपूर | PBF१४३०३T | स्व. धर्मादासजी बन्सीलालजी लाचुरे बहुउद्देशिय शिक्षण मंडळ नागपूर द्वारा संचलित किड्स मेंटॉर ग्लोबल स्कुल नागपूर , उमरेड रोड , दिघोरी नागपूर. | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ७ | नागपूर | PBF१४३६६T | श्री विद्यार्थी सुधार संघ द्वारा संचलित महत्मा गांधी हायस्कुल ॲड ज्युनिअर कॉलेज , वायसीसीई कॅम्पस वानडोंगरी ता हिंगणा जि. नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ८ | मुंबई | PBF००७११T | श्री ज्ञानराज माऊली शिक्षण सेवा मंडळ द्वारा संचलित ॲचिव्हर हायस्कुल ॲड ज्युनिअर कॉलेज , जोशी बाग मल्हार नगर , संतोषी माता मंदीर रोड कल्याण ( वेस्ट) ता. कल्याण जि. ठाणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ९ | पुणे | PBF१८४३३T | श्री ज्ञानेश्वर शिक्षण संस्था द्वारा संचलित अण्णा साहेब डांगे इंटरनॅशनल स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज इस्लापूर ता. वाळवा जि. सांगली. | इलेक्ट्रीकल मेंटेनन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १० | पुणे | PBF०८१३१T | श्री खांदेरी प्रतिष्ठाण द्वारा संचलित सी.एम. इंटरनॅशल स्कुल, एसकेपी कॅम्पस बालेवाडी मुरकुटेनगर ता. हवेली जि. पुणे . | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ११ | नागपूर | PBF१७४६१T | सानंद शिक्षण संस्था द्वारा संचलित जे. डी . चौधरी ज्युनिअर कॉलेज , वासी, ता. समुद्रपुर जि. वर्धा | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| १२ | पुणे | PBF१९१४६T | भिगवन शिक्षण प्रसारक मंडळ द्वारा संचलित कोडीराम सदाशिव क्षिरसागर आर्टस कॉमर्स अँड सायन्स ज्युनिअर कॉलेज भिगवन ता. इंदापूर जि. पुणे | क्रॉप सायन्स | १ |
| १३ | नागपूर | PBF१९७९८T | आई तुलजाभवानी महीला शिक्षण व प्रशिक्षण संस्था द्वारा संचलित महर्षी उत्तम स्वामी महाराज ज्युनिअर कॉलेज चिंचोलीउ खुर्द पो. गोवारी ता. राजुरा. जि. चंद्रपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १४ | औरंगाबाद | PBF१४३७०T | माताजी शिक्षण संस्था द्वारा संचलित महात्मा फुले हायर सेकेंडरी आश्रम स्कुल वाघाला , पो. सिडको( न्यु. नांदेड ) ता. जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| १५ | नागपूर | PBF१७४२२T | मनिषा शिक्षण प्रसारक मंडळ द्वारा संचलित मेजर हेमंत जकाते पब्लीक स्कुल , धम्म हुडकेश्वर रोड नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| १६ | औरंगाबाद | PBF००८५१T | हायटेक एज्युकेशन सोसायटी द्वारा संचलित मॉर्डन कॉलेज ऑफ सायन्स , कोकाटेनगर , सुतमिल रोड लातुर जि. लातुर | क्रॉप सायन्स | १ |
| १७ | नागपूर | PBF१९७४०T | बालाजी शिक्षण प्रसारक मंडळ बामणी द्वारा संचलित मांऊट पब्लीक स्कुल ॲड ज्युनिअर कॉलेज , नंदाफाटा ता. कोरपना जि. चंद्रपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १८ | पुणे | PBF००४५७T | एज्युकेशन करीअर फाऊडेशन द्वारा संचलित नमो रिम्स ज्युनिअर कॉलेज मुकुंदनगर , ता. जि. पुणे. | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| १९ | नागपूर | PBF००४१५T | संबरंग मल्टीपर्पज एज्युकेशन सोसायटी वर्धा द्वारा संचलित सनशाईन ज्युनिअर कॉलेज आदर्श नगर सेवाग्राम वर्धा जि. वर्धा | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| २० | पुणे | PBF१९४७१T | विद्याविकास प्रतिष्ठाण द्वारा संचलित विद्याविकास ज्युनिअर कॉलेज , प्रताप नगर सोरेंगांव , धनगांव रोड सोलापूर , जि. सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| २१ | अमरावती | PBF१७३१६T | गुणवंतराव उपाख्ये अण्णासाहेब देशमुख चॅरीटेबल ट्रस्ट पुसद द्वारा संचलित गुणवंतराव देशमुख माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय पुसद , ता. पुसद जि. यवतमाळ . | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| २२ | पुणे | PBF००४९५T | महात्मा फुले वस्तीगृह द्वारा संचलित एम. पी. ज्युनिअर कॉलेज शिवाजीनगर पुणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २३ | पुणे | PBF१७५६६T | महर्षी विवेकानंद समाजकल्याण संस्था अक्कलकोट द्वारा संचलित सौ. सुरेखा कल्याण शेट्टी सेकेंडरी अँड हायर सेकेंडरी स्कुल अक्कलकोट , ता . अक्कलकोट जि. सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| २४ | मुंबई | PBF१९७२०T | श्री गणपती अंबाजी लोक सेवा निधी द्वारा संचलित तारापुर विद्यामंदीर व ज्युनिअर कॉलेज पी१७ , एम. आय.डी. सी. तारापुर, बोईसर जि. पालघर | बॅकींग | १ |
| २५ | पुणे | PBF१९७३९T | जानता राजा बहुउद्देशिय शिक्षण प्रसारक मंडळ द्वारा संचलित विजयसिंह मोहीते पाटील ज्युनिअर कॉलेज<br>सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| २६ | नाशिक | PBF०६८६२T | प्रवरा मेडीकल ट्रस्ट शेवगांव द्वारा सचलित इंग्लिश मेडीयम स्कुल शेवगांव जि. अहमदनगर | क्रॉप सायन्स | १ |
| २७ | औरंगाबाद | PBF१७२७०T | प्रिया बहुउद्देशिय सेवाभावी प्रतिष्ठाण जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| २८ | नाशिक | PBF०९५३०T | महात्मा फुले एज्युकेशनल कल्चरल अँड स्पोर्टस मंडळ जामखेड द्वारा संचलित राजमाता जिजाऊ हायस्कुल अँड ज्युनिअर कॉलेज खर्डा ,जामखेड जि. अहमदनगर | क्रॉप सायन्स | १ |
| २९ | मुंबई | PBF१००५७T | डॉ. किरण पाटील एज्युकेशनल ट्रस्ट द्वारा संचलित सरदार वल्लभभाई पटेल ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स अँड कॉमर्स दहीसर मुबई | कॉम्प्युटर सायन्स | ३ |
| ३० | पुणे | PBF००४५१T | महात्मा फुले शिक्षण प्रसारक मंडळ द्वारा संचलित श्री एच.बी. गिरमे ज्यु. कॉलेज वाणवाडी पुणे | कॉम्प्युटर सायन्स | २ |
| ३१ | औरंगाबाद | PBF१८१६०T | प्रेरणा सेवाभावी संस्था द्वारा राजुर द्वारा संचलित श्री गणपती माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय राजुर जि.जालना | क्रॉप सायन्स | १ |
| ३२ | नागपूर | PBF०५३०२T | अजय बहुउद्देशिय सेवा मंडळ द्वारा संचलित सुयश कॉन्वेट ज्युनिअर कॉलेज नागपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ३३ | नागपूर | PBF१७१७७T | जगदंबा एज्युकेशन सोसायटी द्वारा संचलित तेजस्विनी ज्युनिअर कॉलेज कोराडी नागपूर जि. नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ३४ | नागपूर | PBF१६५६७T | ज्ञान विज्ञान वर्धीनी नागपूर द्वारा संचलित टिप टॉप कॉन्वेंट सेंकडरी अँड हायर सेकेंडरी स्कुल त्रिमुर्ती नगर नागपूर जि.नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ३५ | नाशिक | PBF०९६१६T | श्रीमती रुक्मराणी एज्युकेशन फाऊंडेशन द्वारा संचलित विसडम हाय इंदरनॅशनल अँड ज्युनिअर कॉलेज नाशिक जि. नाशिक | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ३६ | वाशिम | PBF००३१८T | श्री शिवाजी एज्युकेशन सोसायटी केनवड द्वारा संचलित श्री शिवाजी ज्युनिअर कॉलेज हराल जि. वाशिम | क्रॉप सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३७ | पुणे | PBF१९८५३T | श्री विठ्ठल ज्ञानपिठ आरोग्य शिक्षण प्रसारक संस्था पंढरपूर द्वारा संचलित विठ्ठल रुक्मीणी गुरुकुल विद्यालय अँड ज्युनिअर कॉलेज देगांव जि. पुणे | क्रॉप सायन्स | १ |
| ३८ | अमरावती | PBF१४२५०T | विर जिवा महाला बहुउद्देशिय संस्था धानकी द्वारा संचलित स्वामी विवेकानंद ज्युनिअर कालेज धानकी ता. उमरखेड जि. यवतमाळ | क्रॉप सायन्स | १ |
| ३९ | औरंगाबाद | PBF०९८८५T | श्री गजानन बहुउद्देशिय संस्था नाईक पांगरी द्वारा संचलित राजे शिवाजी माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय रावेगांव ता. बदनापूर जि. जालना | क्रॉप सायन्स | १ |
| ४० | पुणे | PBF१८८५७T | शेतकरी बहुउद्देशिय सामाजिक व शैक्षणिक संस्था गाडेगोव द्वारा संचलित शिवरत्न ज्युनिअर कॉलेज पंढरपुर जि. सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| ४१ | औरंगाबाद | PBF१८३८४T | स्व. प्रभारकरराव माधवराव जाधव सेवाभावी संस्था द्वारा संचलित शाकुंतल ज्युनिअर कॉलेज नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| ४२ | पुणे | PBF१७२३८T | शहाजीराव पाटील प्रतिष्ठाण इंदापूर द्वारा संचलित एस.बी. पाटील ज्युनिअर कॉलेज पुणे | क्रॉप सायन्स | १ |
| ४३ | औरंगाबाद | PBF१८६९४T | विद्यांचल शिक्षण संस्था द्वारा संचलित रामकृष्ण पाटील ( आर.पी. ) ज्युनिअर कॉलेज केलीगव्हाण ता. बदनापूर जि. जालना द्वारा संचलित रुक्मराणी पाटील (आर पी ) स्कुल जालना . ता. जि. जालना | क्रॉप सायन्स | १ |
| ४४ | नाशिक | PBF१९११०T | प्रवरा मेडीकल ट्रस्ट द्वारा संचलित प्रवरा मेडीकल ट्रस्ट आर्टस कॉमर्स अँड सायन्स शेवगांव जि. अहमदनगर | क्रॉप सायन्स | १ |
| ४५ | अमरावती | PBF१७४१५T | मातोश्री शिक्षण सेवा मंडळ द्वारा संचलित प्राजक्ता कला व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय कौलखेडा अकोला | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ४६ | औरंगाबाद | PBF१७७३६T | अभिनव भारत शिक्षण संस्था नांदेड द्वारा संचलित नेताजी सुभाषचंद्र बोस कॉलेज नांदेड ता. जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| ४७ | नाशिक | PBF००७३७T | नाशिक इंस्टिट्युट ऑफ टेक्नॉलॉजी द्वारा संचलित नाशिक प्रेसीडंसी ज्युनिअर कॉजि नाशिक ता . जि. नाशिक | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| ४८ | औरंगाबाद | PBF०८१३०T | जनता शिक्षण प्रसारक मंडळ द्वारा संचलित नरसिंह माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय उमरदरी ता. मुखेड जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| ४९ | नागपूर | PBF१७८९५T | बंसराजसिंग ठाकुर एज्युकेशन सोसायटी द्वारा संचलित निराला उच्च माध्यमिक विद्यालय नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| | | | | इलेक्ट्रॉनिक्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ५० | पुणे | PBF१९८९८T | श्रीराम ग्रामिण संशोधन व विकास प्रतिष्ठाण द्वारा संचलित लोकमंगळ ज्युनिअर कॉलेज वडाळा ता. जि. सोलापूर पिन ४१३२२२ | क्रॉप सायन्स | १ |
| ५१ | पुणे | PBF१९६८१T | कृषी उद्योग मुल शिक्षण संस्था द्वारा संचलित के.यु. एम. एस.एस. ज्युनिअर कॉलेज खराटी पो. | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | बँकींग | १ |
| ५२ | नागपूर | PBF००९००T | स्व. माणिकराव गोविंदराव खडसे ग्रामिण विकास संस्था द्वारा संचलित ज्ञानभारती ज्युनिअर कॉलेज रोहणी ता. देवळी जि. वर्धा | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ५३ | मुंबई | PBF१९०२९T | श्री विद्यासागर एज्युकेशन ट्रस्ट संचलित एस.व्हि. पी. ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स अँड कॉमर्स मिरा रोड ठाणे, जि. ठाणे | बँकींग | १ |
| ५४ | नागपूर | PBF१७१७४T | श्री बालाश्री बहुउद्देशिय शिक्षण संस्था नागपूर द्वारा संचलित राय इग्लिश स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज नागपूर | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ५५ | पुणे | PBF०९४४३T | इंडियन नेशन हुमन डेव्हलपमेंट इंटरगेटिव्ह असोसिध्शन पंढरपुर द्वारा संचलित राजाराम ज्युनिअर कॉलेज राजाराम ज्यु कॉलेज पंढरपुर जि. सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| ५६ | मुंबई | PBF१८२६३T | डॉ. किरण पाटील एज्युकेशनल ट्रस्ट द्वारा संचलित एस.व्हि.पी . ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स आय सी. कॉलनी लिंक रोड बोरीवली , बोरीवली (प) मुंबई | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ५७ | मुंबई | PBF१७४२३T | श्री विद्यासागर एज्युकेशनल ट्स्ट द्वारा संचलित एस.व्हि.पी. ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स अँड कॉमर्स मिरा रोड ठाणे जि. ठाणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५८ | औरंगाबाद | PBF१९८६२T | अगमज्योत एज्येकेशन सोसायटी , औरंगाबाद द्वारा संचलित ऑईस्टर इंटरनॅशनल स्कुल औरंगाबाद ता. जि. | इलेक्ट्रॉनिक्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ५९ | अमरावती | PBF१७२२४T | यवतमाळ जिल्हा अखिल कुणबी समाज यवतमाळ द्वारा संचलित मॉर्डन पब्लीक स्कुल उमरखेड जि. यवतमाळ | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ६० | पुणे | PBF१९८९७T | डॉ. डी. वाय. पाटील पतिष्ठाण द्वारा संचलित डॉ. डी. वाय. पाटील आर्टस , कॉमर्स अँड सायन्स , सालोखे नगर कोल्हापूर , जि. कोल्हापूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ६१ | अमरावती | PBF१९८५२T | स्वामी विवेकानंद शिक्षण प्रसारक बहुउद्देशिय शिक्षण संस्था द्वारा संचलित गुंजकर कॉमर्स कॉलेज, वामन नगर खामगांव ता. खामगांव जि. बुलढाणा | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ६२ | अमरावती | PBF१८१६४T | जागृत नवयुग शिक्षण संस्था वरुड द्वारा संचलित जागृत सायन्स ज्युनिअर कॉलेज वरुड ता. वरुड जि . अमरावती | फ्रेश वॉटर फिश कल्चर | १ |
| ६३ | औरंगाबाद | PBF०९९८०T | पंडीत दिनदयाल उपाध्याय सेवा प्रतिष्ठाण द्वारा संचलित राणी लक्ष्मीबाई ज्युनिअर कॉलेज वसंतनर नांदेड ता. जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| ६४ | औरंगाबाद | PBF१९९८६T | अखिल सेवाभावी शिक्षण प्रसारक मंडळाचे अल अझीझ इंटरनॅशनल प्रायमरी अँड सेकेंडरी अँड हायर सेंकेंडरी अँड ज्युनिअर कॉलेज. महालजा ता . नांदेड जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| ६५ | औरंगाबाद | PBF१९९४५T | अखिल सेवाभावी शिक्षण प्रसारक मंडळचे अल अझिझ ज्युनिअर कॉलेज , गणेश नगर जंगमवाडी , ता. जि. नांदेड | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ६६ | नागपुर | PBF१९१७७T | श्री गुरुदेव शिक्षण प्रसारक संस्था द्वारा संचलित भन्साली ज्युनिअर कॉलेज टाकळी , ता. सावनेर जि. नागपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ६७ | औरंगाबाद | PBF१९९८५T | अखिल सेवाभावी शिक्षण मंडळावे ब्लु बेल्स इंटरनॅशनल प्रायमरी सेकेंडरी अँड हायर सकेंडरी स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज महालजा ता. जि. | क्रॉप सायन्स | १ |
| | | | | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ६८ | नागपुर | PBF०९८७१T | दिलीप जाधव शिक्षण संस्था द्वारा संचलित प्रिया विहार इंग्लिश अँड ज्युनिअर कॉलेज ऑफ सायन्स दुर्गा नगर हिंगणा रोड नागपूर | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ६९ | पुणे | PBF१४३७५T | हांडे देशमुख बहुजन विद्या प्रतिष्ठाण द्वारा संचलित हांडे देशमुख हायटेक सकुल अँड ज्युनिअर कॉलेज आलेफाटा ता . जुन्नर जि. पुणे | हॉटीकल्चर | १ |
| ७० | पुणे | PBF१७२५६T | नातुपुते एज्युकेशन सोसायटी नातेपुते द्वारा संचलित डॉ. बी.जे.दाते प्रशाला अँड ज्यु कॉलेज नातेपुते ता . मालशरीस जि.सोलापूर | क्रॉप सायन्स | १ |
| ७१ | मुंबई | PBF०९७४१T | पेस एज्युकेशन ट्रस्टचे पेस ज्युनिअर कॉलेज कल्याण ता. कल्याण जि. ठाणे | कॉम्प्युटर सायन्स | १ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ७२ | मुंबई | PBF०९७३९T | पेस एज्युकेशन ट्रस्टचे पेस ज्युनिअर कॉलेज चेंबुर | कॉम्प्युटर सायन्स | २ |
| ७३ | मुंबई | PBF१७३४४T | सेंट ग्रेगोरीअस चॅरीटेबटल ट्रस्ट द्वारा संचलित सेंट ग्रेगोरीअस पब्लीक स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज एसीसी रोड लोक एव्हरेस्ट मुलुड (प) | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ७४ | मुंबई | PBF००३९२T | यु . एस ओसवाल एज्युकेशन सोसायटी द्वारा संचलित यु.एस ओसवाल इंग्लीश अकॅडमी ,ओसवाल नगरी, सेंट्रल पार्क. नालासोपारा (पुर्व ) ता .वसई . जि.ठाणे. | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ७५ | मुंबई | PBF००८०७T | पेस एज्युकेशन ट्रस्टचे पेस ज्युनिअर कॉलेज जयभद्र व्हिला एस.व्हि.पी.डी. रोड बोरीवली (वेस्ट ) मुंबई | कॉम्प्युटर सायन्स | ३ |
| ७६ | मुंबई | PBF०९५७१T | सेंट मेरीज कॉन्वेट सोसायटी अलीबाग द्वारा संचलित सेंट मेरी कॉन्वेट हायर सेंकेंडरी स्कुल अँड ज्युनिअर कॉलेज चेंधरे , अलिबाग जि.रायगड | कॉम्प्युटर सायन्स | १ |
| ७७ | अमरावती | PBF००३१९T | श्री शिवाजी एज्युकेशन सोसायटी केनवड द्वारा संचलित शिवाजी ज्युनिअर कॉलेज जऊलका रे ता. मालेगांव जि. वाशिम | क्रॉप सायन्स | १ |

| प्रपत्र ब | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या विद्यमान तसेच नविन सस्थेंत नविन / अधिकच्या तुकडयांना व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास शैक्षणिक सत्र २०२०-२०२१ या शैक्षणिक सत्रापासुन मान्यता देण्यात आलेल्या संस्थाची यादी.** | | | | | |
| अ.क्र. | विभागाचे नांव | ऑनलाईन नोंदणी क्रमांक | संस्थेचे नाव | मागणी केलेल्या अभ्यासक्रमाचे नाव | तुकडयांची संख्या |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | पुणे | PPS०६७९०T | श्री साई विकास संस्था द्वारा संचलित चेतन दत्ताजी गायकवाड विद्यालय मेतगुताड ता. महाबलेश्वर जि. सातारा. | मल्टी स्किल फाऊंडेशन कोर्स | १ |
| २ | पुणे | PPS१७५७७T | विद्याप्रतिष्ठाण मराठी मेडीयम स्कुल बारामती जि. पुणे | इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी | २ |